सन २०१५ च्या उन्हाळयात ग्रामीण व
नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या
टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या
उपाययोजनांना मुदतवाढ देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई-२०१५ /प्र.क्र.१५४/पापु-१४**
**मंत्रालय,मुंबई-४०० ००१**
तारीख: २९ जुलै, २०१५

**वाचा --**

1. **शासन निर्णय क्रमांकः टंचाई-३०९९/प्र.क्र.१३/पापु-१४, दिनांक ०१ फेब्रुवारी १९९९**
2. **शासन निर्णय क्रमांकः टंचाई-२०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दिनांक ०३ फेब्रुवारी १९९९**
3. **शासन निर्णय क्रमांकः टंचाई-२००८/प्र.क्र.१४९/पापु-१४, दिनांक २१ ऑगस्ट २००९.**
4. **शासन निर्णय क्रमांकः टंचाई-२०१५ /प्र.क्र.१५४/पापु-१४, दिनांक २.७.२०१५.**

**प्रस्तावना --**

संदर्भाधीन दि.२१ ऑगस्ट २००९ च्या शासन निर्णयान्वये, राज्यातील नागरी भागामध्ये व दि. १ व ३ फेब्रुवारी, १९९९ च्या शासन निर्णयान्वये ग्रामीण भागामध्ये पाणी टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांसाठी स्थायी आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. सदर स्थायी आदेशानुसार पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजना दि. ३० जून पर्यंत राबविण्यात येतात. सदर उपाययोजना राबविण्यासाठी संदर्भ क्रमांक ४ अन्वये दिनांक ३१.७.२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. तथापि, अद्यापि राज्यातील काही भागात आतापर्यंत झालेले अपुरे पर्जन्यमान विचारात घेता राज्यात पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांसाठी देण्यात आलेली मुदतवाढ आणखी एक महिन्यापर्यंत म्हणजेच दिनांक ३१.८.२०१५ पर्यंत वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती लक्षात घेता, राज्यातील ग्रामीण भागात व नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ आवश्यकता लक्षात घेऊन औरंगाबाद महसूली विभागातील सर्व जिल्हे तसेच नाशिक विभागातील नाशिक, जळगाव आणि अहमदनगर, पुणे विभागातील पुणे, सातारा, सांगली व सोलापूर, अमरावती विभागातील अमरावती, बुलढाणा, अकोला, वाशिम व यवतमाळ या जिल्ह्यामध्ये पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजना घेण्यास दिनांक ३१ ऑगस्ट, २०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

तसेच, उपरोक्त जिल्हे वगळता राज्यातील अन्य जिल्ह्यामधील ज्या तालुक्यांमध्ये ग्रामीण भागात व नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ टंचाई उपाययोजना घेणे आवश्यक वाटेल अशा जिल्ह्यामध्ये जिल्हाधिकारी यांनी तालुकानिहाय गावांमध्ये टंचाई जाहिर करुन त्या त्या ठिकाणी पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ टंचाई उपाययोजना घेण्यासाठी दिनांक **३१.८.२०१५** पर्यंत मुदतवाढ देण्यास जिल्हाधिकाऱ्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, तसेच वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा यांनी सविस्तर माहिती घेऊन व विश्लेषण करुन, केवळ पाणी टंचाई निर्माण झालेल्या गावे /वाडयांमध्ये तसेच नागरी क्षेत्रात आवश्यकतेनुसार स्थानिक परिस्थिती व स्त्रोतांचा विचार करुन पाणी टंचाई निवारणार्थ किमान खर्चाच्या उपाययोजना घेण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही तातडीने करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२९१७५७३३४५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.07.31 13:37:59 +05'30'

**(म. भ. सावंत)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, (सर्व)
२. जिल्हाधिकारी (सर्व )
३. आयुक्त, महानगरपालिका, (सर्व )
४. महालेखापाल-१ / २ (लेखा परिक्षा ), मुंबई / नागपूर
५. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई / नागपूर
६. प्रधान सचिव ( मदत व पुनर्वसन ), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ (५प्रती) (शासन निर्णयास प्रसिध्दी देण्याच्या विनंतीसह)

११.सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई .

१२.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे

१३.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१४.जिल्हा कोषागार अधिकारी ( सर्व ).

१५.मुख्याधिकारी, नगरपालिका ( सर्व )

१६.विभागीय उप संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा ( सर्व ).

१७.कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)

१८.महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय (१० प्रती)

१९.पापु-१४ (निवड नस्ती)